**महानगरपालिका आयुक्त व मुख्याधिकारी नगर परिषद/नगरपंचायत यांच्यासाठी २०१८-१९ करिता महत्वाची फलनिष्पत्ती क्षेत्रे (KRA) निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०८ जानेवारी, २०१९

**शासन निर्णय :-**

राज्यातील नागरी क्षेत्रामध्ये सातत्याने वाढ होत आहे. वाढते नागरीकरण ही संधी मानून नागरी क्षेत्रात प्रभावी विकास करण्यासाठी केंद्र व राज्य शासनाच्या महत्त्वपूर्ण योजनांबाबत कालबध्द व कालमर्यादेत कार्यवाही करण्याच्या अनुषंगाने राज्यातील आयुक्त, महानगरपालिका व सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायत यांच्यासाठी २०१८-१९ या वर्षासाठी विशेष फलनिष्पत्ती क्षेत्रे (Key Result Areas) खालील प्रमाणे विहित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | के. आर. ए. |
|---|---|
| १ | **नागरी स्वच्छतेत अग्रक्रम मिळविणे :-**<br>• वाढते नागरीकरण ही संधी मानून नागरी स्वच्छतेच्या प्रभावी अंमलबजावणीस अनन्यसाधारण महत्व प्राप्त झाले आहे. मागील वर्षी केंद्रशासनाने राबविलेल्या स्वच्छ सर्वेक्षण-२०१८ मध्ये राज्यातील शहरांनी उत्तम कामगिरी बजावली होती. त्याहून सरस कामगिरी स्वच्छ सर्वेक्षण २०१९ मध्ये होणे अत्यावश्यक आहे.<br>• संपूर्ण शहर हागणदारी मुक्त राखण्यात सातत्य राखणे. (QCI Validation सह)<br>• शासन परिपत्रक दि. २९ एप्रिल, २०१७ मधील सूचनेनुसार घन कचरा विलगीकरण मोहिम राबवणे. घनकचऱ्यांचे १०० टक्के विलगीकरण करणे.तसेच ओल्या कच-याचे कंपोस्टिंग करणे. (दिनांक ३१ मार्च, २०१९ पर्यंत)<br>• उपरोक्त तीनही उपक्रमांसोबतच, स्वच्छ सर्वेक्षण २०१८ मध्ये शहरास मिळालेल्या गुणानुक्रमापेक्षा (Rank), स्वच्छ सर्वेक्षण २०१९ मध्ये अधिक प्रगत गुणानुक्रम (Higher Rank) मिळविणे. |
| २ | **विविध करांची वसूली:-**<br>• मालमत्ता कर व इतर करांची ९० टक्क्यांपेक्षा जास्त (चालू व मागील) वसुली करणे व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या आर्थिक स्थितीत भरीव सुधारणा करणे. |
| ३ | **स्वउत्पन्नवाढीसाठी विशेष उपाययोजना:-**<br>• नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या उत्पन्नाच्या स्त्रोताचा पाया बळकट करुन उत्पन्नामध्ये वाढ करणे.<br>• यामध्ये मालमत्ता कर वसुलीसाठी जीआयएस (GIS) प्रणालीचा अवलंब करणे, सर्व मालमत्ता कराच्या जाळ्यात आणणे.<br>• शासनाच्या प्रचलित धोरणानुसार दुकानगाळे भाडयाच्या दरांचे पुनर्विलोकन करणे, इत्यादी |

| | |
|---|---|
| ४ | **पायाभूत सुविधा प्रकल्प पूर्ण करणे**:-<br>• जवाहरलाल नेहरू नागरी पुनरूत्थान अभियान (JNNURM) व नगरोत्थान मधील रखडलेले प्रकल्प कालमर्यादेत पूर्ण करणे.<br>• यामध्ये अमृत योजनेतील व नगरोत्थान योजनेतील चालू तसेच, नव्याने मंजूर करण्यात येणाऱ्या सर्व प्रकल्पांची प्रभावी अंमबजावणी करणे,<br>• स्मार्ट सिटीज अभियानातील प्रकल्पांची कालमर्यादेत प्रभावी अंमलबजावणी करणे.<br>• या सर्व प्रकल्पांमधून अंतिम फलनिष्पत्ती (Outcome) साध्य करण्यासाठी विशेष प्रयत्न करणे. |
| ५ | **सेवा हमी कायद्याची अंमलबजावणी करणे व इतर प्रशासकीय बाबी**:-<br>• सेवा हमी कायद्याची प्रभावी अंमलबजावणी करणे.<br>• आपले सरकार/ लोकशाही दिन/पीजी पोर्टल वरील संदर्भावर कालमर्यादेत कार्यवाही करणे.<br>• महालेखापालांचे आक्षेप, लोकलेखा समितीशी संबंधित बाबींवर कालमर्यादेत कार्यवाही करणे.<br>• लोक आयुक्त प्रकरणे, विधानमंडळाशी संबंधित कामकाज/ न्यायालयीन प्रकरणे याबाबत कालमर्यादेत कार्यवाही करणे. |

२. राज्यातील आयुक्त, महानगरपालिका व सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायत यांचे उपरोक्त नमूद क्षेत्रामधील कामकाज व त्यामधील प्रगतीच्या आधारे संबंधित अधिकाऱ्यांचे २०१८-१९ या वर्षाच्या कार्यमूल्यांकन अहवालासाठी (PAR) साठी / वार्षिक गोपनिय अहवालासाठी (ACR) मूल्यमापन करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१०८१७०११५५९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Manisha Patankar Mhaiskar

Digitally signed by Manisha Patankar Mhaiskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fef2886076676dbebee07d0f1af7414b764ea7e53ecaa48a423e4054ca267ca6, serialNumber=52783a272fc45f858a9efa9d9e02be6ef3188f66348e265a2d1f209ee93b9f6c, cn=Manisha Patankar Mhaiskar
Date: 2019.01.08 17:52:52 +05'30'

**( मनीषा म्हैसकर )**
**प्रधान सचिव (नवि-२)**

**प्रत :-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सह सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
५) आयुक्त, सर्व महानगरपालिका **(बृहन्मुंबई वगळून)**

६) सर्व सह सचिव / उप सचिव, नगर विकास विभाग

७) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय,मुंबई

८) अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान, मुंबई

९) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपंचायती

१०) निवड नस्ती नवि-३३.

*****